20150423152427 4327

(२८२)

देवखार खारभूमी योजना ता.ठाणे, जि.ठाणे या योजनेच्या नुतनीकरणाच्या कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र.खाभूयो २०१०/(५३७/२०१०) खारभूमी
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १/०४/२०११

पहावे : मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांचे पत्र क्र.३८०६/खाभू/देवखार/तां-२(१) ८१६०, दि.१५/११/२०१०

**प्रस्तावना :-**

देवखार खारभूमी योजना ता.ठाणे, जि.ठाणे, सदर खारभूमी योजना बृहत आराखडयात समाविष्ट आहे. केंद्रीय वन मंत्रालयाने किनारी नियमन अधिनियम १९९१(CRZ) अन्वये या योजनेस सूट दिली आहे. सदर योजनेची एकूण लांबी ३२५० मी. असून त्यावर सा.क्र.८९७,२९८० मी. वर दोन उघाडयांचा समावेश आहे. सदर योजना स्थानिक माती वापरुन बांधली आहे. समुद्राचे नियमित येणा-या भरती-ओहोटी व अतिवृष्टी यामुळे बांधाची मोठया प्रमाणात धूप होऊन बांध कमकुवत झाला आहे. सन १९५७ पासून या योजनेवर नुतनीकरणाचे काम न झाल्याने शेतकऱ्यांचे मोठे नुकसान होत आहे. ही योजना तातडीने हाती घेण्याबाबत लाभधारक व ग्रामपंचायतीची आग्रही लेखी स्वरुपात मागणी केली आहे. त्यामुळे सदर योजनेचा प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांच्याकडून प्राप्त झाला असून सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

या शासन निर्णयान्वये देवखार खारभूमी योजना ता.ठाणे, जि.ठाणे या योजनेस सन २००८-०९ खारभूमी व सा.बां.वि. दरसूची २००९-१० या वर्षाच्या दरसूचीवर आधारित या योजनेस अंदाजित रू.१,२१,३२,७४३/- (रुपये एक कोटी, एकवीस लक्ष, बत्तीस हजार, सातशे त्रेचाळीस फक्त) यापैकी रू.१,१०,२९,७६६/- कामाप्रित्यर्थ व रू.११,०२,९७७/- अनुषंगिक खर्च रकमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. उपशीर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबत जोडलेल्या परिशिष्टामध्ये देण्यात येत आहे.

२. या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-३, मुख्य लेखाशिर्ष "४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२) मृद खार जमीन योजना(१) बांधकामे (योजनांतर्गत)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व त्यावरील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

D:\2010\kharbhumi\Patil\suprama gr.doc

३. हा शासन निर्णय पाटबंधारे व वीज विभाग क्र.एर्पाएच १०७३/३२६५३/ई(३),दि.१७.७.१९७४ मधील परिशिष्ट क्र.(३) व शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०६/प्र.क्र.८२/०६ विनियम दिनांक १३/०३/२००७ मधील तरतूदीनुसार आतंर वित्त सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता (२१/२०११) अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( ज.प्र.जहागिरदार )
शासनाचे अवर सचिव

प्रतिलीपी अंदाजाच्या गोषवा-यावसह :-

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर
स्वीय सहाय्यक, मा.मंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहाय्यक, मा.राज्यमंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, (दवप्र) व सहसचिव, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई
आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उपसचिव (लघु पाटबंधारे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रकल्प संचालक व अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे
अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उपअभियंता (खारभूमी), जलसंपदा विभाग मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, ठाणे
अर्थशाखा १/२(२ प्रती), जलसंपदा विभाग,
खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ.

D:\2010\kharbhumi\Patil\suprama gr.doc

शासन निर्णय क्रमांक खाभूयो २०१०/(५३७/२०१०) खारभूमी दिनांक १/०४/२०११ चे सहपत्र
देवखार खारभूमी योजना ता.ठाणे, जि.ठाणे, अंदाजपत्रकाचा गोषवारा

| अ.क्र. | उपशिर्ष | एकूण रूपयात |
|---|---|---|
| १ | 'अ' प्राथमिक | १९,१५०.०० |
| २ | 'बी' भूसंपादन | ०.०० |
| ३ | 'सी' मुख्य कामे | १,०१,५४,५९१.०० |
| ४ | 'एफ' आर.एच.टी. वर्क्स | ७,६७,५४४.०० |
| ५ | 'के' इमारती | ०.०० |
| ६ | 'एम' वृक्षारोपण | १०,४०३.०० |
| ७ | 'ओ' संकीर्ण | ५०,७७३.०० |
| ८ | 'पी' देखभाल | २७,३०५.०० |
| ९ | 'आर' दळणवळण | ०.०० |
| | एकूण | १,१०,२९,७६६.०० |
| | अनुषंगिक खर्च (भूसंपादन वगळून) | ११,०२,९७७.०० |
| | **एकूण** | **१,२१,३२,७४३.००** |

ठळक वैशिष्टये

| | |
|---|---|
| पुन:प्रापित क्षेत्र | १९८.५६ हेक्टर |
| प्रती हेक्टरी किंमत (रु.) | ६११०४ |
| लाभव्यय गुणोत्तर | ६.२६ |

D:\2010\kharbhumi\Patil\suprama gr.doc